आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ साठी शबरी आदिवासी घरकुल योजनेसाठी निधी वितरीत करण्याबाबत.
(मुख्य लेखाशीर्ष - २२२५ डी २७१)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र.०२ /कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: -२१ फेब्रुवारी, २०२३.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३ /अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ व दि.८.०२.२०२३.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, समक्रमांक, दि.६.०७.२०२२, दि.२४.११.२०२२, दि.१३.१२.२०२२ व दि.१२.०१.२०२३.
३) शासन निर्णय, आ.वि.वि. क्र.आविवि-०४२२/प्र.क्र.२३/का-०८,दि.३.०२.२०२३.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पुरक-२०२२/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.१.११.२०२२.
५) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र.मागणी-११२२/प्र.क्र.९२/का-०८.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत शबरी आदिवासी घरकुल योजनेतून अनुसूचित जमातीच्या पात्र लाभार्थ्यांना पक्के घरकुल बांधण्यासाठी अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यात येते. या योजनेंतर्गत दरवर्षी उद्दिष्ट निश्चित करण्यात येऊन त्याप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. सदर योजनेच्या अर्थसंकल्पित तरतूदीतून या योजनेंतर्गत सन २०१६-१७ ते सन २०२१-२२ या कालावधीतील तसेच सन २०२२-२३ या वर्षातील घरकूलांचे उद्दीष्ट पुर्ण करण्याकरीता रू.३००.०० कोटी इतका मुळ अर्थसंकल्पित निधी वितरीत करण्यात आला आहे. सन २०२२-२३ या वर्षात वाढीव घरकूलांचे उद्दीष्ट निश्चित करण्याच्या अनुषंगाने माहे डिसेंबर,२०२२ च्या हिवाळी अधिवेशनात रू.६८३.२५ कोटी इतका अतिरिक्त निधी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

सदर पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित निधी वितरण प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरून उपलब्ध करून दिलेल्या निधी वितरण मर्यादेत निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २२२५ - अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली शबरी आदिवासी घरकुल योजनेकरीता सन २०२२-२३ या वर्षातील तरतुदींतून खालीलप्रमाणे **रु.३४१६२.५० लाख (अक्षरी रुपये तीनशे एक्केचाळीस कोटी बासष्ट लाख पन्नास हजार फक्त)** इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | बाब | सन २०२२-२३ अर्थसंकल्पीय तरतूद (मूळ+ पुरवणी) | यापुर्वी वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| शबरी आदिवासी घरकुल योजना (२२२५डी२७१) | ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | ९८३२५.०० | ३००००.०० | ३४१६२.५० |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.३४१६२.५० लाख (अक्षरी रुपये तीनशे एक्केचाळीस कोटी बासष्ट लाख पन्नास हजार फक्त)** इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. त्यांनी सदर योजनेचे अंमलबजावणी अधिकारी म्हणून संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी तथा उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष (ग्रामीण गृहनिर्माण) यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण (BEAMS) प्रणालीवर तात्काळ वितरीत करावा.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.४.०४.२०२२ व दि.८.०२.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय कार्यालयाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१३८/२०२३,व्यय-१४, दि.१४.०२.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२०१२४२५२९५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA
DEVARAM
BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A,
cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.02.22 15:58:44 +05'30'

**(राजेंद्र दे.भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. संचालक,राज्यव्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण,महाराष्ट्र राज्य,सीबीडी-बेलापूर,नवी मुंबई.
६. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. सर्व प्रकल्प अधिकारी (ए.आ.वि.प्र.)
१०. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.